**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून डी.वाय.पाटील स्कुल ऑफ आर्किटेक्चर, पुणे या संस्थेत मास्टर ऑफ आर्किटेक्चर (इनव्हॉरमेंटल आर्किटेक्चर) हा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२९१/तांशि-४,**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०६ ऑगस्ट, २०१८.

संदर्भ :- १. वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. CA/५/Academic-MH७५, दि.०४.०७.२०१८
२. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २/एनसीजी/ मान्यता/२०१८/९३९, दिनांक १२.०७.२०१८

प्रस्तावना :-

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.०१ येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भ क्र.०२ येथील पत्रान्वयेडी.वाय.पाटील स्कुल ऑफ आर्किटेक्चर, पुणे या संस्थेत **मास्टर ऑफ आर्किटेक्चर (इनव्हॉरमेंटल आर्किटेक्चर)** हा २० प्रवेशक्षमता असलेला नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्तावित केले आहे.

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणेडी.वाय.पाटील स्कुल ऑफ आर्किटेक्चर, पुणे या संस्थेत **मास्टर ऑफ आर्किटेक्चर (इनव्हॉरमेंटल आर्किटेक्चर)** हा २० प्रवेशक्षमता असलेला नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेली मान्यता विचारात घेऊन संचालक, तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त नमूद पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार डी.वाय.पाटील स्कुल ऑफ आर्किटेक्चर, पुणे या संस्थेत **मास्टर ऑफ आर्किटेक्चर (इनव्हॉरमेंटल आर्किटेक्चर)** हा २० प्रवेशक्षमता असलेला नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत वास्तुकला परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेक्षक्षमता विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे राहील .

३) शासनाने विहित केलेल्या तसेच वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य विद्यापीठ अधिनियम,१९९४ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शिक्षण शुल्क समितीने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके वास्तुकला परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वास्तुकला परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

११) संस्थेस सदर अभ्यासक्रम बंद करावयाचा झाल्यास तो विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन टप्प्याटप्प्याने सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने बंद करता येईल. मात्र, एकाचवेळी या अभ्यासक्रमाचे सर्व वर्ग बंद केल्यास संस्थेने संयुक्त खात्यात ठेवलेली संचित ठेव शासन जमा करण्यात येईल.

१२) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१३) संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नसल्यासत्या संस्थेकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८०६१७४४०६०००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.08.07 17:17:51 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे

३) कुलसचिव, सावित्रीबाई फुले, पुणे विद्यापीठ, गणेशखिंड रोड, पुणे - ४११ ००७

४) सचिव, डी.वाय.पाटील एज्युकेशनल ॲकेडमी, आंबी तळेगाव, पुणे - ४१० ५०७

५) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

६) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

७) सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.

८) रजिस्ट्रार, वास्तुकला परिषद, इंडिया हॅबीटेट सेंटर, कोअर-६ए, पहिला मजला, लोधी रोड, नवीदिल्ली-११०००३.

९) निवड नस्ती / तांशि-४.